"स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव या अंतर्गत" विविध
कार्यक्रम/उपक्रम आयोजनासाठी निधी
वितरणाबाबत

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२४/प्र.क्र.८८भाग (१)/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०२४

**वाचा :-** १. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय, क्र. संकीर्ण ८२२१/ प्र.क्र.१७२(भाग १)/सां.का.४, दि.१३ ऑक्टोबर, २०२१
२. सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.सां.का.सं./ २०६४, दिनांक ३० मार्च, २०२४

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या सुचनेनुसार राज्यामध्ये सन २०२१ पासुन "स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव" वर्षानिमित्त विविध उपक्रम/कार्यक्रम शासनाकडून राबविण्यात येत आहेत. उपर्निर्दिष्ट दि. १३ ऑक्टोबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये "स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव" अंतर्गत विविध समित्या गठीत करण्यास मान्यता देण्यात आली होती. सदर समित्यांमध्ये मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांच्या अध्यक्षतेखाली मा. मंत्रीमंडळातील सदस्य यांचा समावेश असलेली कोअर समिती स्थापन करण्यात आली होती. या कोअर समितीच्या विविध बैठकांमध्ये घेण्यात आलेल्या कार्यक्रम / उपक्रम यांच्या मान्यतेनुसार निधी वितरण करण्यात येते. त्यामुळे स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सव अंतर्गत राबवावयाचे उपक्रम व आयोजित करावयाचे कार्यक्रम यांना निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव" मधील एक छत्र योजनेंतर्गत प्राप्त तरतूदीतून राबवावयाचे विविध उपक्रम/कार्यक्रमांसाठी रुपये १९,६०,१४,९१८/- ( अक्षरी रुपये एकोणवीस कोटी साठ लाख चौदा हजार नऊशे अठरा फक्त ) इतक्या खर्चास सांस्कृतिक कार्य संचालनालय व महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगांव , मुंबई यांना संयुक्त विद्यमाने करण्यास व त्यावरील खर्चास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर खर्च लेखाशिर्ष मागणी क्र. झेडडी-२, मुख्य लेखाशिर्ष २२०५, कला व संस्कृती, (१०२) कला व संस्कृती, (१३) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव, (१३) (०१) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवांतर्गत कार्यक्रम, (२२०५ ३७३३) - ५० इतर खर्च (कार्यक्रम) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा. सदर तरतूद ही सहायक अनुदान स्वरुपाची असल्याने सदर देयक MTR ४४ या देयक नमुन्यात सादर करावे. सदर निधी सशर्त असल्याने वेळोवेळी सांस्कृतिक कार्य संचालनालयामार्फत शासनास उपयोगिता प्रमाणपत्र संबंधीतांना सादर करणे बंधनकारक राहील.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना निधी वितरणासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, लेखाधिकारी, संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२५०-२०२४/व्यय १५, दि. २० मार्च, २०२४ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३३१२२०६१७२४२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2024.03.31 22:16:25 +05'30'

**( बाळासाहेब ई. सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय मुंबई
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगांव , मुंबई
४. उप सचिव ( सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
५. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, एम.जी. रोड, मुंबई
६. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
१०. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
११. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपूर
१३. निवड नस्ती, सां.का.४.